शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून एकाच व्यवस्थापनामार्फत सुरु असलेल्या संस्था विलिन करण्यास शासन मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्रशिक्षण विभाग

## शासन निर्णय क्र.टीईएम-२०२०/प्र.क्र.९४/तांशि-४

हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १८ सप्टेंबर, २०२०.

**वाचा :-** १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र एफ.क्र.वेस्टर्न /१-७०२२२३२१२६/२०२०/ईओए, दिनांक १५/०६/२०२०

२) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र एफ.क्र.वेस्टर्न /१-७०२२२३२६५४/२०२०/ईओए, दिनांक १५/०६/२०२०

३) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची पत्रे क्रमांक २/ एनजीसी /२०२०/मान्यता/५७८ व ६५३, दि. १४/०८/२०२० व दि.०४/९/२०२०.

**प्रस्तावना :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी प्रकाशित केलेल्या APH (Approval Process Handbook) २०२०-२१ मधील २.१० नुसार एकाच व्यवस्थापनामार्फत सुरु असलेल्या संस्था विलिन (merging) करण्याची तरतूद आहे. त्यानुसार सोबत जोडलेल्या प्रपत्र “अ” मधील अभियांत्रिकी व व्यवस्थापनशास्त्र पदविका, पदवी व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांच्या संस्था विलिन करण्यास अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेली आहे. त्याप्रमाणे संचालक, तंत्र शिक्षण यांनी वर नमूद क्रमांक ३ येथील दिनांक १४/७/२०२० व ०४/०९/२०२० रोजीच्या ०२ स्वतंत्र पत्रांव्दारे या संस्थांच्या विलिनीकरणास शासन मान्यता देण्याची विनंती केली आहे.

**शासन निर्णय :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी मान्यता दिल्यानुसार सोबतच्या प्रपत्र “अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे संस्था विलिनीकरणास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.
२. प्रस्तुत विलिनाकरणानंतरची प्रवेश क्षमता अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद,नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०२०-२१ करीता मंजूर केल्याप्रमाणे राहील.
३. उपरोक्त मान्यता संस्थेने प्रोसेसिंग फी भरण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.
४. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेचे प्रवेक्षक्षमता वर नमुद केल्याप्रमाणे राहील.

५. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

६. संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

७. सदर पदवी व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

८. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

९. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते कर्मचाऱ्यांना देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

१०. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके  अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे.  तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आ तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

११. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणेआवश्यक राहील.

१२. याशिवाय संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०२००९१८१७१७३३८९०८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: CN = SANJAY AUDUMBAR DHARURKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPT
Date: 2020.09.18 17:46:03 +05'30'

**(संजय औ.धारुरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, ३०५, शासकीय तंत्रकिनेतन इमारत,४९, खेरवाडी,अलियावर जंग मार्ग, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०००५१

३. सहसंचालक, सर्व तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).

४. कुलसचिव, सर्व संबंधित विद्यापीठे (संचालक,तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

५. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, रायगड

६. प्राचार्य, सर्व संबंधित संस्था (संचालक,तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

७. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.

८. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.

९. फार्मसी काऊन्सिल ऑफ इंडिया, कम्बाईन्ड काऊन्सिल बिल्डींग, कोटला रोड, ऐवान-ए-गालिब मार्ग, नवी दिल्ली -११०००२

१०. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.

११. निवड नस्ती/तांशि-४

प्रपत्र "अ"

उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रम.टीईएम-२०२०/प्र.क्र.९४/तांशि-४, दि. १८ सप्टेंबर, २०२०

शैक्षणिक वर्ष २०२०-२१ करीता संस्था विलिनीकरण करण्यासाठी अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे मान्यतेस अनुसरुन शासनास प्रस्तावित प्रस्तावांची यादी

संस्था विलिनीकरण २०२०-२१

| अनु क्र. | विलीन होणा-या संस्थांचे नाव व डीटीई कोड | विलिन झाल्यानंतर संस्थेचे नाव व डीटीई कोड | अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| १ | २११२- श्रीयश प्रतिष्ठानचे, श्रीयश कॉलेज ऑफ इंजिनिअरींग ॲन्ड टेक्नॉलॉजी, औरंगाबाद (पालक संस्था)<br><br>२१७३- श्रीयश प्रतिष्ठानचे, श्रीयश पॉलिटेक्निक, औरंगाबाद | २११२- श्रीयश प्रतिष्ठानचे, श्रीयश कॉलेज ऑफ इंजिनिअरींग ॲन्ड टेक्नॉलॉजी, औरंगाबाद | <u>पदवी</u><br>१. कॉम्प्युटर सायन्स ॲन्ड इंजिनिअरींग<br>२. सिव्हिल इंजिनिअरींग<br>३. मेकॅनिकल इंजिनिअरींग<br>४. इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन्स इंजि.<br>५. इलेक्ट्रिकल इंजि.<br><br><u>पदव्युत्तर पदवी</u><br>६.एमबीए<br>७.कॉम्प्युटर सायन्स ॲन्ड इंजि.<br>८.मेकॅनिकल इंजि.<br>९.स्ट्रक्चरल इंजि.<br>१०.इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन्स इंजि.<br><br><u>पदविका</u><br>११.सिव्हिल इंजि.<br>१२.मेकॅनिकल इंजि.<br>१३.कॉम्प्युटर इंजि.<br>१४.इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन इंजि.<br>१५.इलेक्ट्रिकल इंजि. |
| २ | ६८१२-प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे मॉडर्न इन्स्टिटयूट ऑफ बिझनेस स्टडीज, निगडी, पुणे (पालक संस्था)<br><br>६१११- प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे मॉडर्न इन्स्टिटयूट ऑफ कॉम्प्युटर ॲप्लीकेशन, निगडी, पुणे | ६८१२-प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे मॉडर्न इन्स्टिटयूट ऑफ बिझनेस स्टडीज, निगडी, पुणे | <u>पदव्युत्तर पदवी</u><br>१.एमबीए<br><br>२.एमसीए |